**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : दुवाअ १०१०(३)/(प्र.क्र.३६/१०)/पाच,
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २४ डिसेंबर, २०१०.

प्रति

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

**विषय :- नवीन सायकल खरेदी करण्यासाठी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत. वित्तीय वर्ष-२०१०-२०११.**

महोदय,

विषयांकित प्रकरणी आदेशावरुन मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता आपणांस कळविण्यात येते की, मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील नियम १३६, १३७ व १३९ तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अग्रिम-१००५/प्र.क्र.१८/२००५/ विनियम, दि. १० जून, २०१० च्या अधिन राहून, संबंधित कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने, श्री. पी.एम. घरडे, कनिष्ठ लिपिक, **जिल्हा व सत्र न्यायालय**, नागपूर यांना **नवीन सायकल खरेदी** करण्यासाठी अग्रिम म्हणून **रु.२,५००/- (रुपये दोन हजार पाचशे फक्त)** इतकी रक्कम **२०१०-२०११** या वित्तीय वर्षाकरिता असलेल्या मंजूर अनुदानातून प्रमाणित करण्यात येत आहे.

२. अर्जदाराने सायकल विकत घेतल्यास त्यांच्या कार्यक्षमतेत वाढ होईल याची खात्री झाल्यानंतरच अग्रिम मंजूर करण्यात यावे. **अर्थसंकल्प वितरण प्रणालीनुसार अनुदान उपलब्ध असेल तोपर्यंत** या अग्रीम धनास मंजुरी देऊन अग्रीमाची रक्कम कोषागारातून काढण्यात यावी. तसेच कोषागारातून रक्कम काढल्यानंतर ती रक्कम तीन दिवसाच्या आत अर्जदारास देण्यात यावी.

३. संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

४. **शासन निर्णय वित्त विभाग दि.१०.०६.१० मधील परिच्छेद ३(५) अनुसार एकदा अग्रिम दिल्यानंतर पुन्हा अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही. तसेच, सदर शासन निर्णय निर्गमित होण्यापूर्वी शासकीय अग्रिम घेऊन खरेदी केलेल्या जुन्या वाहनाऐवजी पुनःश्च नवीन वाहन खरेदीसाठी अग्रिम अनुज्ञेय राहणार नाही.** अर्जदार खरेदी करणार असलेल्या सायकलीची किंमत प्रमाणित अग्रिमापेक्षा कमी असल्यास शिल्लक रक्कम शासनास ताबडतोब परत केली जाईल याची दक्षता घ्यावी.

५. सदर अग्रिमाची वसूली वित्त विभागाच्या उपरोक्त दिनांक १०.०६.२०१० च्या शासन निर्णयात नमूद केल्यानुसार **व्याजासह १० समान मासिक हप्त्यात** करण्यात यावी. प्रथम अग्रिम व नंतर व्याज वसूल करण्यात यावे. शासन निर्णय, वित्त विभाग दि.२४ जून, २०१० अनुसार **व्याजाचा दर ८.५%** आहे.

६. हा खर्च मागणी क्र. जे-५-७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्ज (योजनेतर/दत्तमत) २०३(००)(०१) इतर वाहने (सायकल) खरेदी करण्याकरिता आगाऊ रक्कम (लेखा संकेतांक क्रमांक ७६१० ०४९ १) या शीर्षाखाली २०१०-२०११ या सालाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सायकल अग्रिमाच्या मुद्दलाची रक्कम ७६१०-शासकीय कर्मचारी इ.ना कर्जे २०३-इतर वाहने खरेदी करण्याकरिता आगाऊ रक्कम (७६१० ५०३ २००) या जमाशीर्षाखाली जमा करावी व व्याजाची रक्कम ००४९ व्याजाच्या जमा रकमा (४७)(३) इतर वाहनांच्या खरेदीसाठी आगाऊ रकमा या जमाशीर्षाखाली जमा करावी.

८. हे अग्रिम धन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास पाठविण्यात यावी. तसेच प्रत्यक्ष कोषागारातून रक्कम काढल्याचा **प्रमाणक क्रमांक व दिनांक** त्वरीत कळविण्यात यावा. तसेच प्रमाणित रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित रक्कम **त्वरित** शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. उपरोक्त प्रमाणित रकमेचा विनियोग झाला किंवा कसे याबाबत शासनास **त्वरित** कळविण्यात यावे.

९. आपल्या कार्यालयासमोर दर्शविलेल्या अर्जदारास अर्जदारनिहाय इतकेच अग्रिम धन मंजूर करावे. निर्देशिलेल्या अर्जदाराव्यतिरिक्त दुसऱ्या कोणत्याही अर्जदारास हे अग्रिम देय होणार नाही याची कृपया नोंद घ्यावी.

१२. हे पत्र निधी उपलब्धतेचे प्रमाणपत्र आहे.

**आपला,**

(वा.कि. रासंकर)
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत-माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी :-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
जिल्हा व सत्र न्यायाधीश, नागपूर,
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर,
विधी व न्याय विभाग (कार्यासन २३ व २४),
वित्त विभाग/विनियम
निवड नस्ती.